उप सचिव संवर्गातील अधिकाऱ्यांच्या
बदल्या - श्री. दे.आ.गावडे

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांक : संकीर्ण २०१७/प्र.क्र.५८/का.१४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २०.०६.२०१७

संदर्भ :- शासन आदेश समक्रमांक दि.०८.०५.२०१७

**आदेश**

श्री.दे.आ.गावडे, उप सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग यांची संदर्भाधीन आदेशान्वये उद्योग, ऊर्जा व कामगार विभागात बदलीने पदस्थापना करण्यात आली होती. या सदर आदेशात अंशत: बदल करण्यात येत असून श्री.दे.आ.गावडे, उप सचिव यांची कृषि व पदुम विभागात बदली करण्यात येत आहे.

२. श्री.दे.आ.गावडे, उप सचिव यांना सार्वजनिक आरोग्य विभागाने दि.२६.५.२०१७ रोजी कार्यमुक्त केले आहे. श्री.दे.आ.गावडे, उप सचिव यांचा दि.२६.५.२०१७ ते आदेशाच्या दिनांकापर्यंतचा कालावधी हा सक्तीचा प्रतिक्षाधीन कालावधी मंजूर करण्यास सामान्य प्रशासन विभागाची मान्यता देण्यात येत आहे. सक्तीचा प्रतिक्षाधीन कालावधी मंजूर करण्याची कार्यवाही म.ना.से. (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम १९८१ च्या नियम ९(१४)(एफ) नुसार व शासन निर्णय, वित्त विभाग, दि.२.६.२००३ मधील तरतुदीनुसार बदली झालेल्या अधिकाऱ्यांना संबंधित विभागाने कार्यमुक्त करुन या विभागास कळवावे. तसेच बदली झालेल्या अधिकाऱ्यांनी त्यांना कार्यमुक्त केल्यावर पदस्थापना दिलेल्या विभागात तत्काळ हजर व्हावे.

३. सदर कार्यालयीन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक २०१७०६२०१८५९०९६२०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Imtiyaz
Mushtaque Kazi

Digitally signed by Imtiyaz Mushtaque Kazi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=711589caceff9b0bb07e3c6556e724501d0c5ea5c63b3146314d51ec0e87d0a6, cn=Imtiyaz Mushtaque Kazi
Date: 2017.06.20 18:56:43 +05'30'

**( इ.मु.काझी )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
२) मा.मुख्यमंत्र्यांचे अ.मु.स.
३) अ.मु.स (सेवा), सा.प्र.वि., मंत्रालय, मुंबई
४) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
५) अ.मु.स./प्रधान सचिव/ सचिव - सार्वजनिक आरोग्य विभाग/कृषि व पदुम/ उद्योग, उर्जा व कामगार विभाग
६) सह/उप सचिव (आस्थापना) - सार्वजनिक आरोग्य विभाग/कृषि व पदुम/ उद्योग, उर्जा व कामगार विभाग
७) संबंधित अधिकारी , विभागामार्फत
८) निवड नस्ती कार्या.१४.